**छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या शिवराज्याभिषेक वर्षानिमित्त गड किल्ल्याच्या वर्णनात्मक गीत व नाट्यछटा प्रसंग संकल्पनेबाबत सांस्कृतिक कार्यक्रमावरील आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३/प्र.क्र. ७८८/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ मार्च, २०२४

**वाचा :-** सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ५६७, दिनांक ०१ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

"स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव" च्या निमित्ताने नियमित कार्यक्रमांसमवेत विविध नाविन्यपूर्ण कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येत आहेत. सदर कार्यक्रम/उपक्रम कला व साहित्यक्षेत्रामध्ये भरघोस योगदान दिलेल्या व्यक्ती यांचा गौरव व्हावा, तसेच त्या कलाकृती / व्यक्ती / महत्वपूर्ण औचित्य याबाबत नवीन पिढीला माहिती व्हावी म्हणून व त्या माहितीद्वारे नवीन पिढीच्या ज्ञानात भर पडावी, या उद्देशाने अशा व्यक्ती / कलाकृतीचे हीरक, अमृत, शताब्दी इ. या औचित्याने महोत्सव आयोजित करण्यात येतात.

याच पार्श्वभूमीवर छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या शिवराज्याभिषेक वर्षानिमित्त गड किल्ल्याच्या वर्णनात्मक गीत व नाट्यछटा प्रसंग संकल्पनेबाबत सांस्कृतिक कार्यक्रम माहे मार्च मध्ये आयोजित करण्यात येत आहे. सदर कार्यक्रम खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या शिवराज्याभिषेक वर्षानिमित्त गड किल्ल्याच्या वर्णनात्मक गीत व नाट्यछटा प्रसंग संकल्पनेबाबत सांस्कृतिक कार्यक्रम माहे मार्च मध्ये मुंबई येथे आयोजित सांस्कृतीक कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्च रु. ६,००,०००/- (अक्षरी रुपये सहा लक्ष फक्त ) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशिर्षे मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१९१४४८५३०३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA
SURYAKANT
DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.19 15:04:13 +05'30'

**(अनिरुध्द सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.निवड नस्ती, सां.का.४